५

20140822113650323

**प्रोत्साहन योजना २००० (पूर्वलक्षी प्रभावाने रद्द करण्यात आलेली) खाली पात्र ठरलेल्या घटकांना प्रोत्साहन योजना २००६ अंतर्गत सवलती व लाभ अनुज्ञेय करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**क्रमांक टीडीएम २००७/६/प्र.क्र.२४३/पर्यटन,**
**मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२.**
**दिनांक :- २९ ऑगष्ट २००९**

**वाचा :-** १) शासन निर्णय क्र. एमटीसी २००१/प्र.क्र.२३/पर्यटन, दिनांक १६/०९/२००१.
२) शासन निर्णय क्र. एमटीसी २००५/२/प्र.क्र.१७२/पर्यटन, दिनांक १६/१२/२००६.
३) शासन निर्णय क्र. एमटीसी २००४/११/प्र.क्र.४७५/भाग-२/पर्यटन, दिनांक ०८/०५/२००७.

**शासन निर्णय:-** शासन निर्णय क्र. एमटीसी २००१/प्र.क्र.२३/पर्यटन, दि. १६ सप्टेंबर २००२ अन्वये पर्यटन धोरण २००० जाहिर करण्यात आले होते. सदर धोरणांत संःदिग्धता आढळल्यामुळे सदर धोरण दि. ८ मे २००७ च्या शासन निर्णया अन्वये रद्द केले आहे. त्यामुळे पर्यटन प्रोत्साहन योजना १९९९ च्या शासन निर्णयातील तरतूदी विक्रीकर वगळून दि. १६ डिसेंबर २००६ पर्यंत अनुज्ञेय करण्यात आलेल्या आहेत. तसेच पर्यटन प्रोत्साहन योजना २००० पुर्वलक्षी प्रभावाने रद्द केल्यामुळे या योजनेमध्ये नोंदणी केलेल्या आणि योजनेतील सवलतीचा लाभ मागणाऱ्या पर्यटन घटकांना पर्यटन धोरण २००६ अंतर्गत प्रोत्साहन योजनेचा लाभ देण्याचा विचार करण्याकरीता समिती गठित केली आहे. सदर समितीची दि. २४/०९/२००८ रोजी बैठक होवून बैठकीत प्रोत्साहन योजना २००० (पूर्वलक्षी प्रभावाने रद्द करण्यात आलेली) खाली पात्र ठरलेल्या घटकांना प्रोत्साहन योजना २००६ अंतर्गत सवलती व लाभ अनुज्ञेय करण्याबाबत शिफारस केली होती.

सदर समितीच्या शिफारशींच्या अनुषंगाने दि. २१/०८/२००९ रोजी झालेल्या मंत्रीमंडळाच्या बैठकीतील निर्णयानुसार पर्यटन प्रोत्साहन योजना २००० (पूर्वलक्षी प्रभावाने रद्द करण्यात आलेली) खाली पात्र ठरलेल्या घटकांना पर्यटन धोरण २००६ अंतर्गत लाभ व सवलती अनुज्ञेय करण्यास या शासन निर्णयान्वये खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून शासन मान्यता देत आहे.

**अटी व शर्ती:**

१. पात्र घटकाने प्रोत्साहन पर्यटन योजना २००० अंतर्गत सवलती व लाभ मिळण्यासाठी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाकडे विहित मुदतीत व नियमाप्रमाणे प्रस्ताव सादर करणे आवश्यक आहे.

२. महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाने प्राप्त झालेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने प्रस्ताव तपासून पर्यटन धोरण २००० अंतर्गत, प्रोत्साहन योजने अंतर्गत सवलती व लाभ मिळण्यासाठी पात्रता प्रमाणपत्र देणे आवश्यक आहे.

३. महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाकडे पर्यटन धोरण २००० अंतर्गत प्राप्त झालेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने घटकांस पात्र ठरवून सदर घटकांस पर्यटन धोरण २००६ अंतर्गत सवलती व लाभ अनुज्ञेय करण्यासाठी शासनाकडे प्रस्ताव सादर करणे आवश्यक राहील.

४. महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाकडे प्राप्त झालेल्या पात्र घटकांचे प्रस्ताव शासनाकडे सादर केल्यानंतर शासन पात्र घटकांना पर्यटन धोरण २००६ अंतर्गत प्रकरण निहाय लाभ व सवलती देण्याबाबत निर्णय घेईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( भूषण गगराणी )
**सचिव पर्यटन व सांस्कृतिक कार्य**

**प्रति,**

मा. राज्यपालाचे सचिव, राजभवन, मुंबई
मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. राज्यमंत्री (पर्यटन), यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
मा. मुख्यसचिव, मंत्रालय, मुंबई
महासंचालक, पर्यटन विभाग, भारत सरकार, नवी दिल्ली
मंत्रालयीन विभागाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान, सचिव/सचिव मंत्रालय, मुंबई
सचिव, पर्यटन यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
नोंदणी महानिरिक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
सर्व विभागीय आयुक्त
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हापरिषदेचे मुख्य कार्याकारी अधिकारी
सहव्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
विक्रिकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रिकर भवन, माझगांव, मुंबई
अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई
जिल्हा कोषाधिकारी, मुंबई
भारत सरकार, पर्यटन कार्यालय, महर्षी कर्वे रोड, चर्चगेट, मुंबई
फेडरेशन ऑफ हॉटेल ॲण्ड रेस्टॉरन्ट अशोसिएशन (वेर्स्टन इंडिया), मुंबई
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग (आस्थापना), मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती.

**********